**पोलीस / सैन्यदल भरतीपूर्व प्रशिक्षण केंद्र, धारणी , जि.अमरावती येथे एक हॉल, संडास,बाथरुम व पाण्याच्या टाकीचे बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांक: पोप्रके-२००९/प्र.क्र.९८/का-५**
**मंत्रालय,मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : १५ जून,२००९**

**वाचा:** आयुक्त आदिवासी विकास,नाशिक यांचे पत्र क्रमांक:विकास-२००८/प्र.क्र.६(०८)/ का-३(५), दिनांक ३० मार्च,२००९.

**शासन निर्णय:-** आयुक्त आदिवासी विकास,नाशिक यांच्या संदर्भिय पत्रान्वये अमरावती जिल्हयातील धारणी येथील पोलीस / सैन्यदल भरतीपूर्व प्रशिक्षण केंद्राकरिता एक हॉल व संडास, बाथरुम व पाण्याच्या टाकीचे सविस्तर अंदाजपत्रके उप अभियंता,सार्वजनिक बांधकाम उप विभाग क्र.१,धारणी यांनी तयार केले आहे. ही अंदाजपत्रके सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित आहेत. प्रस्तुत इमारतीचे काम वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून वास्तूमांडणी नकाशा व इमारतीचा सविस्तर नकाशा तयार करुन त्यास मंजूरी घेतल्यावरच सुरु करावे. पाण्याची टाकी आर.सी.सी.चीच बांधावी सिंटेक्स टाकीचा वापर करु नये. या अंदाजपत्रकात आकस्मिक खर्च व विद्युतीकरणासाठी केलेल्या तरतूदी आता अनुक्रमे ४% व ९% इतक्या सुधारित करण्यात आल्या असून, संगणकीकरणासाठी २% रकमेच्या तरतुदी या अंदाजपत्रकात केली आहे. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे.

२. प्रस्तुत कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यास सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दिलेली आहे. त्यानुसार उपरोक्त अटींच्या अधीन राहून तसेच भाववाढ ( Price Escalation )वगळुन **रु.०९,४०,६१५/-** इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. बांधकामाचा खर्च २२३००७५५ या नियमित लेखाशिर्षातर्गत आयुक्त आदिवासी विकास,नाशिक यांनी करावा. तसेच हे काम एक वर्षाच्या आत पूर्ण करावे. सदर निधी अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ,अमरावती यांना उपलब्ध करुन द्यावा. त्यानुसार अंदाजपत्रकाच्या किंमती खालीलप्रमाणे येतात.

| अ.क्र. | पोलीस / सैन्यदल केंद्राचे नांव | तालुका / जिल्हा | अंदाजित किंमत रु. |
|---|---|---|---|
| १ | धारणी | धारणी,जि.अमरावती | ०९,४०,६१५ /- |
| | | **एकूण** | **०९,४०,६१५ /-** |

३. या बांधकामासाठीच्या अंदाजपत्रकास व नकाशास दिलेल्या मान्यतेच्या धर्तीवर सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे. शासन निर्णय,वित्त विभाग क्र: विपअ-१००१/ प्र.क्र.४६/२००१/विनियम, दिनांक ११/०७/२००१ मधील भाग पहिला, उपविभाग, पाच अनुक्रमांक - १, नियम १३४ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या WWW.maharashtra.-.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २००९०६१२१२५४२१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( पि. रा. भोसले )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रति,
आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक
अपर आयुक्त,आदिवासी विकास,अमरावती
सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई
कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग,अमरावती
प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,धारणी,जि.अमरावती
महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर
उपसचिव,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
कार्यासन-७, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
निवड नस्ती (का-५)